**महाराष्ट्र शासन**

**सामान्य प्रशासन विभाग**

**क्रमांकः उसप-१३१४/प्र.क्र.६०/१४/चौदा**

मादाम कामा मार्ग,हुतात्मा राजगुरू चौक

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२

तारीख: ०१.०१.२०१५

**संदर्भ -** १. शासन आदेश, सा.प्र.वि. क्र.उसप १३१०/प्र.क्र.११५/१०/१४, दि.१५.०५.२०१०
२. शासन आदेश, सा.प्र.वि. क्र.उसप १३११/प्र.क्र.७४/११/१४, दि.११.१०.२०११
३.शासन आदेश, सा.प्र.वि. क्र.उसप १३११/प्र.क्र.८१/११/१४, दि.११.०७.२०१२
४.शासन आदेश, सा.प्र.वि. क्र.उसप १३११/प्र.क्र.८१/११/१४, दि.१०.०९.२०१४

**आदेश**

संदर्भाधीन आदेश क्र.१ अन्वये डॉ.अभय वाघ, उपसंचालक, तंत्रशिक्षण संचालनालय यांची प्रथमत: एक वर्षाकरिता उच्च व तंत्र शिक्षण विभागात उपसचिव (तंत्र शिक्षण) या पदावर प्रतिनियुक्तीने तात्पुरत्या स्वरुपात नियुक्ती करण्यात आली होती. तद्नंतर संदर्भाधीन आदेश क्र.२,३ व ४ अन्वये सदर नियुक्तीला दि.३१/०८/२०१५ पर्यंत मुदतवाढ देण्यात आली होती.

२. तथापि, म.ना.से. (स्वीयेतर सेवा) नियम १९८१ मधील नियम ४० व परिशिष्ट तीन (१) नुसार यापूर्वीच डॉ. वाघ यांच्या प्रतिनियुक्तीचा विहीत कालावधी पूर्ण झाला आहे. तसेच उच्च व तंत्र शिक्षण विभागाने अन्य प्रशासकीय कारणास्तव त्यांच्या सेवा तंत्र शिक्षण संचालनालयाच्या मूळ आस्थापनेवर प्रत्यावर्तीत करण्याचे प्रस्तावित केले आहे. ही वस्तुस्थिती विचारात घेऊन डॉ. वाघ यांच्या मंत्रालय संवर्गातील उपसचिव या पदावरील सेवा प्रशासकीय कारणास्तव संपुष्टात आणून त्यांच्या तंत्र शिक्षण संचालनालयाच्या मूळ आस्थापनेवर या आदेशान्वये प्रत्यावर्तीत करुन त्यांना कार्यमुक्त करण्यात येत आहे.

३. डॉ. वाघ यांना उपसचिव (तंत्र शिक्षण) पदावरुन सदर आदेशान्वये तात्काळ कार्यमुक्त करुन रिक्त होणाऱ्या सदरच्या पदावर डॉ.किरण ने. पाटील, अवर सचिव, मा.मुख्यमंत्री कार्यालय यांना पदोन्नतीने नियुक्ती करण्यात येत आहे. तसेच सदरचे आदेश तात्काळ अमलात येतील.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०१०५१५५६२७३४०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Satish Karbhari Jondhale

Digitally signed by Satish Karbhari Jondhale
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=GAD, postalCode=400020, st=Maharashtra, cn=Satish Karbhari Jondhale
Date: 2015.01.05 16:03:32 +05'30'

**(स.का.जोंधळे)**

उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन

२. मा.मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव
३. प्र.स.(सेवा),सा.प्र.वि.
४. प्रधान सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग
५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
६. सह / उप सचिव (आस्था) उच्च व तंत्र शिक्षण विभाग
७. डॉ. अभय वाघ, उपसचिव (तंत्र शिक्षण), उच्च व तंत्र शिक्षण विभाग
८. डॉ. किरण पाटील, अवर सचिव, मा. मुख्यमंत्री यांचे कार्यालय
९. निवड नस्ती कार्यासन-१४